केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान (NLM- National Livestock Mission) या योजनेच्या सन २०२१-२२ पासूनच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०२१/प्र.क्र. १५७ / पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक : २७ डिसेंबर, २०२१**

**वाचा**- १. केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे पत्र क्र. २४७/ २००९, AHT (FF)/ NML Vol. III, दि. २१ मे, २०१४

२. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०१४/प्र.क्र. १७०/ पदुम-४ दि. २० ऑक्टोबर, २०१४

३. केंद्र शासनाचे पत्र क्र. आर-९९०१४/४५/२०२१ एएनएलएम-डीएडीएफ (इ-१९७९९),नवी दिल्ली, दि. ९ ऑगस्ट, २०२१ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना.

४. शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१४/पदुम-१६,दि. ६ सप्टेंबर, २०२१

५. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०१४/प्र.क्र. १७०/ पदुम-४ दि. ०८ डिसेंबर, २०१७

६. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०१४/प्र.क्र. १७०/ पदुम-४ दि. २९ एप्रिल, २०१६

७. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०१४/प्र.क्र. १७०/ पदुम-४ दि. ०३ ऑगस्ट, २०१५

८. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०१४/प्र.क्र. १७०/ पदुम-४ दि. ११ सप्टेंबर, २०१४ (विविध ०२ शासन निर्णय)

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने १२ व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत विविध केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करून राष्ट्रीय पशुधन अभियान (National Livestock Mission) या नवीन योजनेस संदर्भ क्र. १ येथील दि. २१ मे, २०१४ च्या पत्रान्वये प्रशासकीय मंजुरी प्रदान केलेली आहे. त्यास अनुसरून सदंर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान (NLM-National Livestock Mission) या योजनेच्या राज्यातील अंमलबजावणीस प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तदनंतर अभियानाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने वाचा क्र. ५, ६, ७ व ८ येथील विविध शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत.

सदंर्भ क्र. ३ येथील पत्रानुसार केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाने केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाबाबतच्या सुधारीत मार्गदर्शक सुचना माहे जुलै, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या असून, त्या अंतर्गतचे विविध कार्यक्रम सन २०२१-२२ पासून राबवावयाचे आहेत.

केंद्र शासनाकडून निर्गमित सुधारित मार्गदर्शक सुचनांनुसार राष्ट्रीय पशुधन अभियान या अंतर्गत खालीलप्रमाणे ३ उप-अभियानांचा समावेश केलेला आहे.

(अ) पशुधन आणि कुक्कुट प्रजाती विकास उप-अभियान (Sub-Mission on Breed Development of Livestock and Poultry )

(ब) पशुखाद्य व वैरण उप-अभियान ( Sub-Mission on Feed and Fodder Development).

(क) नाविन्यपुर्ण योजना व विस्तार उप-अभियान (Sub-Mission on Innovation and Extension)

केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन आणि दुग्धव्यवसाय विभागामार्फत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून राष्ट्रीय पशुधन अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय पशुधन अभियान योजनेची सध्याची गरज लक्षात घेऊन सन २०२१-२२ पासून राष्ट्रीय पशुधन अभियानाची सुधारित पुनर्रचना करण्यात आलेले आहे. राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या सुधारित योजनेचा उद्देश रोजगार निर्मिती, उद्योजकता विकास, प्रती पशुची उत्पादकता वाढवणे आणि अशा प्रकारे विकास कार्यक्रमांतर्गत एका छत्राखाली मांस, बकरीचे दूध, अंडी उत्पादन वाढविणे असा आहे. या कार्यक्रमांतर्गत अतिरीक्त उत्पादन देशांतर्गत मागणी पूर्ण केल्यानंतर निर्यात करता येईल. राष्ट्रीय पशुधन अभियान योजनेची संकल्पना म्हणजे असंघटित क्षेत्रामध्ये उपलब्ध उत्पादनांसाठी विक्रीकरीता आणि कच्चा माल उपलब्ध होणेकरीता संघटित क्षेत्राशी जोडून उद्योजकता विकास साधणे ही आहे.

केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान (NLM- National Livestock Mission) ही योजना केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यात राबविण्यास याद्वारे शासनाची प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

सन २०२०-२१ या वर्षापर्यंत केंद्र शासनाने मंजुर केलेल्या व अदयापही ज्या योजनांची राज्यात अंमलबजावणी सुरू आहे अशा योजना संदर्भ क्र. २, ५, ६, ७ व ८ येथील शासन निर्णयानुसार राबविण्यात याव्यात. तथापि, सन २०२१-२२ पासून केंद्र शासनाकडून मंजूर होणाऱ्या योजनांची अंमलबजावणी सदर शासन निर्णयान्वये करण्यात यावीत.

सदरची योजना केंद्र शासनाकडून वेळोवेळी निर्गमित झालेल्या /होणाऱ्या मार्गदर्शक सूचनांन्वये तसेच, राज्यास प्रत्यक्ष वितरित होणाऱ्या केंद्र हिश्याच्या निधीस अनुसरून राबविण्यात यावी. या योजनांसाठी देय असलेल्या राज्य हिश्यासाठीचा निधी पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागास दरवर्षा प्राप्त होणाऱ्या नियतव्ययातून अर्थसंकल्पित करण्यात यावा. पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या विविध योजना व सदर केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये एकाच स्वरूपाच्या योजनेची पुनरूक्ती होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

सन २०२१-२२ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत विविध ०३ उप-अभियाननिहाय केंद्र शासनाने मंजूर केलेल्या योजनांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**अ) पशुधन व कुक्कुट वंश सुधारणा उप-अभियान** (Sub-Mission on Breed Development of Livestock and Poultry)

| अ. क्र | योजनेचे नाव | अनुदानाची टक्केवारी | | केंद्र शासनाच्या अनुदानाची अधिकतम मर्यादा | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | | |
| १. | ग्रामीण कुक्कुट पालनातुन प्रजाती विकासाद्वारे उद्योजगता विकास (Establishment of Enterpreneurs for breed development of rural poultry) | ५० | - | एक वेळ ५० टक्के भांडवली अनुदान अधिकतम मर्यादा रु. २५.०० लक्ष प्रति युनिट (दोन समान हप्त्यांमध्ये) | कमीत कमी १,००० अंड्यावरील (लो इनपुट तंत्रज्ञान) कुक्कुट पक्ष्यांचे संगोपन व अंडी उबवणी केंद्राची स्थापना (उर्वरित ५० टक्के बँकेचे कर्ज अथवा लाभार्थी स्वहिस्सा) |
| २. | ग्रामीण शेळी-मेंढी पालनातुन प्रजाती विकासाद्वारे उद्योजगता विकास (Establishment of Enterpreneurs for breed development in small ruminant sector (sheep and goat farming )) | ५० | - | ५० टक्के भांडवली अनुदान रु. ५०.०० लक्ष (दोन समान हप्त्यांमध्ये) | ५०० शेळ्या / मेंढ्या अधिक २५ बोकड / नर मेंढे गटाची स्थापना करणे (उर्वरित ५० टक्के बँकेचे कर्ज अथवा लाभार्थी स्वहिस्सा) |
| ३. | विविध शेळ्या व मेढ्यांच्या जातीमधील अनुवंशिक सुधारणा (Genetic Improovement of Sheep and Goat breeds) | | | | |
| ३.१ | शेळी व मेंढीच्या विर्यमात्रा निर्मितीसाठी विभागीय प्रयोगशाळेची स्थापना (Establishment of Regional Semen Production Laboratory snd Semen bank of Sheep and Goat) | ६० | ४० | केंद्र शासनाचे एक वेळ अर्थसहाय्य रु. ४००.०० लक्ष अधिक रु. ३०.०० लक्ष | अनुवंशिक सुधारणेतुन उत्पादनात वाढ करणे |
| ३.२ | राज्य शेळी-मेंढी वीर्यपेढीची स्थापना (Establishment of State Semen Bank) | १०० | - | एक वेळचे अर्थसहाय्य रु. १०.०० लक्ष | शेळया-मेंढ्यांमध्ये गोठीत विर्य वापरुन कृत्रिम रेतनाचे तंत्रज्ञान वृध्दिंगत करणे. |
| ३.३ | अस्तित्वात असलेल्या गाई-म्हशींच्या कृत्रिम रेतन केद्रामधुन शेळ्या- मेंढ्यांमधील कृत्रिम रेतन वृध्दिंगत करणे (Propagation of Artificial Insemination through existing Cattle & Buffalo Artificail Insemination Centers) | ६० | ४० | प्रती केंद्र रु. ४,२००/- केंद्र शासनाचे अनुदान | कृत्रिम रेतनाच्या सहाय्याने शेळया-मेंढ्यामधील अनुवंशिक सुधारणा करणे |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३.४ | शेळया-मेंढ्यांच्या वंशामध्ये अनुवंशिक सुधारणा करण्याकरिता विदेशातून जर्म प्लाझम आयात करणे (Import of Exotic Sheep and Goat Germ plasm) | ६० | ४० | - | कृत्रिम रेतनाच्या सहाय्याने उच्च प्रतीचे विर्य वापरुन शेळया-मेंढ्यामध्ये अनुवंशिक सुधारणा करणे |
| ४. | वराहपालनद्वारे उद्योजगता विकास (Promotion of Piggery Entrepreneur) | ५० | - | एक वेळ ५० टक्के भांडवली अनुदान रु. ३०.०० लक्ष | १०० मादी अधिक २५ नर वराह गटाची स्थानना करणे (उर्वरित ५० टक्के बँकेचे कर्ज अथवा लाभार्थी स्वहिस्सा) |
| **५.** | **वराह जातीमधील अनुवंशिक सुधारणा** (Genetic Improovement of Pig Breeds | | | | |
| ५.१ | वराह विर्य प्रक्रिया प्रयोगशाळेची स्थापना (Establishment of Pig Semen Collection and Processing Laboratory) | ६० | ४० | रु. १५०.०० लक्ष अधिक एक वेळचे आवर्ती खर्चासाठीचे अनुदान रु. ३०.०० लक्ष | वराह वीर्य प्रक्रिया प्रयोगशाळेची स्थापना करणे |
| ५.२ | वराह वंशामध्ये अनुवंशिक सुधारणा करण्यासाठी विदेशातून जर्म प्लाझम आयात करणे (Import of Exotic Pig Germ Plasm) | ६० | ४० | - | विदेशी उच्च अनुवंशिक गुणवत्तेच्या प्रजातींचा वापर करुन देशी वराह जातींचे उत्पादन वाढविणे. |

आ) **पशुखाद्य व वैरण विकास उप-अभियान** (Sub-Mission on Feed and Fodder Development)

| अ. क्र | योजनेचे नाव | अनुदानाची टक्केवारी | | केंद्र शासनाच्या अनुदानाची अधिकतम मर्यादा | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १. | गुणवत्तापुर्ण वैरण बियाणे उत्पादनाकरीता अनुदान (Assistance for Quality Fodder Seed Production) | १०० | - | बियाणे प्रकार | प्रति किलो उत्पादनासाठी अनुदान |
| | | | | मुलभूत बियाणे | रु. २५० /- |
| | | | | पायाभुत बियाणे | रु. १५०/- |
| | | | | प्रमाणित बियाणे | रु. १००/- |
| २. | पशुखाद्य व वैरण उद्योजगता विकास (Entrepreneurial activities in Feed and Fodder) | ५० | - | प्रकल्प किंमतीच्या ५० टक्के रू.५०.०० लक्ष पर्यंत | मुरघास बेल, वैरणीच्या विटा आणि टी.एम.आर. निर्मिती करीता दोन टप्यांमध्ये SIDBI मार्फत अनुदान (उर्वरित ५० टक्के बँकेचे कर्ज अथवा लाभार्थी स्वहिस्सा) |

इ) **नाविन्यपुर्ण संशोधन व विस्तार उप-अभियान** (Sub-Mission on Innovation and Extension)

| अ. क्र | योजनेचे नाव | अनुदानाची टक्केवारी | | केंद्र शासनाच्या अनुदानाची अधिकतम मर्यादा | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| १. | नाविन्यपुर्ण उपक्रम, संशोधन व विकास (Research and Development & Innovations) | १०० | - | - | - |
| २. | विस्तार उपक्रम (Extension Activities) | ६० | ४० | - | - |
| ३. | पशुधन विमा (Livestock Insurance) | | | | |
| ३.१ | दारिद्रय रेषेखालील / अनु. जाती / अनु. जमातीचे लाभार्थी | ४० | ३० | | उर्वरीत हिस्सा पशुपालकाने भरावयाचा आहे. प्रति कुटुंब ०५ पशुधनाकरिता (शेळी, मेंढी, वराह व ससा वगळून) योजनेचा लाभ मर्यादीत. शेळी, मेंढी, वराह व ससा यांचे बाबतीत या योजनेअंतर्गत ०५ कॅटल युनिटकरिता लाभ देय (एक कॅटल युनिट = १० शेळ्या, मेंढ्या, वराह व ससे) |
| ३.२ | दारिद्रय रेषेवरील लाभार्थी | २५ | २५ | | |

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान या सुधारित योजनेची उद्दीष्टे व योजना अंमलबजावणी कार्यपध्दती खालील प्रमाणे असेल.

**अ. अभियानाची उदिष्टे:-**

१. छोटे रवथं करणारे प्राणी, कुक्कुट पालन, वराह पालन क्षेत्र आणि वैरण क्षेत्राचा विकास करून रोजगार निर्मिती व उद्योजकता विकास करणे.
२. पशुधनाच्या वंशावळीमध्ये सुधारणा करून प्रती पशुधनाच्या उत्पादन क्षमतेत वाढ करणे.
३. मांस, अंडी, शेळीचे दूध, लोकर आणि वैरण यांच्या उत्पादनात वाढ करणे.
४. वैरण आणि वैरणीची उपलब्धता वाढवून मागणी लक्षणीयरित्या कमी करण्यासाठी चारा बियाणे पुरवठा साखळी मजबूत करणे आणि प्रमाणित चारा बियाण्यांची उपलब्धता वाढविणे.
५. मागणी - पुरवठ्यातील अंतर कमी करण्यासाठी वैरण प्रक्रिया युनिट्स स्थापन करण्यास प्रोत्साहन देणे.
६. शेतकऱ्यांसाठी पशुधन विम्यासह जोखीम व्यवस्थापन उपायांना प्रोत्साहन देणे.
७. कुक्कुटपालन, मेंढी, शेळी, पशुखाद्य आणि वैरण या प्राधान्यकृत क्षेत्रांमध्ये व्यावहारीक संशोधनाला प्रोत्साहन देणे.
८. पशुपालकांना दर्जेदार विस्तार सेवा पुरवण्यासाठी विस्तार यंत्रणा मजबूत करून राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांची आणि पशुधन मालकांची क्षमता वाढविणे.
९. उत्पादन खर्च कमी करण्यासाठी आणि पशुधन क्षेत्राचे उत्पादन सुधारण्यासाठी कौशल्य आधारित प्रशिक्षण आणि तंत्रज्ञानाचा प्रसार करणे.

**आ. योजनेचे कार्यक्षेत्र :-**

सदर योजना महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये राबविण्यात यावी.

**इ. संस्थात्मक रचना :-**

पशुसंवर्धन विभागाकडे प्राप्त होणाऱ्या प्रकल्प प्रस्तावांना मंजूरीस्तव शिफारस करून, सदरचे प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्याकरिता खालीलप्रमाणे राज्यस्तरीय कार्यकारी समिती गठित करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय कार्यकारी समिती** (SLSC- State Level Executive Commitee):

| | |
|---|---|
| अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| सहसचिव /उपसचिव, (पशुसंवर्धन ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर | सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे | सदस्य |
| अवर सचिव (कार्यासन पदुम-३/४ ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

सदर समितीमध्ये आवश्यकतेप्रमाणे विभागांतर्गत कार्यरत इतर अधिकारी व विषय तज्ञांना निमंत्रित करता येईल.

**राज्यस्तरीय कार्यकारी समितीचे कार्य:**

राज्यस्तरीय कार्यकारी समिती आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची योग्यता तपासून, पात्र प्रस्ताव अनुदान मंजूरीसाठी केंद्र शासनास शिफारशीसह सादर करेल.

राष्ट्रीय पशुधन अभियान अंतर्गत समावेश करण्यात आलेल्या व केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या योजनांच्या प्रकल्प प्रस्तावांच्या छानणी करिता पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर विषयानुसार छानणी समिती गठित करण्यात यावी. याबाबत पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर आदेश निर्गमित करण्यात यावेत.

राष्ट्रीय पशुधन अभियान या योजनेकरिता वाचा क्र. ४ येथे नमुद दि. ०६.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे एकल कार्यन्वयन यंत्रणा (सिंगल नोडल एजंसी) म्हणून कार्यरत राहतील. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्पांना अनुदानाचा निधी राज्य एकल कार्यन्वयन यंत्रणा (सिंगल नोडल एजंसी) यांचेमार्फत अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्यात येईल.

**राष्ट्रीय पशुधन अभियान योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्य अंमलबजावणी यंत्रणेचे कामकाज :**

- आयुक्त पशुसंवर्धन हे उद्योजक / पात्र संस्थांचे अर्ज अभिव्यक्ती स्वारस्य पध्दतीने आमंत्रित करतील.
- उद्योजक / पात्र संस्थांनी सादर केलेल्या अर्जांची छाननी आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयाच्या स्तरावर केल्यानंतर उद्योजक / पात्र संस्थांना अनुसूचित बँका किंवा राष्ट्रीय सहकार विकास निगम (एनसीडीसी) इत्यादी वित्तीय संस्थांद्वारे प्रकल्पासाठी शासकीय अनुदानाव्यतिरिक्त अधिकचा निधी कर्ज रुपाने वित्तपुरवठा करण्यासाठी प्रकल्प तांत्रिकदृष्ट्या सक्षम असल्याबाबत शिफारस करेल.
- बँकेने कर्ज पुरवठ्याची हमी दिल्यानंर, सदर प्रकल्प राज्यस्तरीय कार्यकारी समितीसमोर (एसएलईसी) केंद्र शासनास शिफारसीकरिता सादर करण्यात येतील.
- राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) द्वारे प्रकल्पांना मंजूरीस्तव शिफारस प्राप्त झाल्यानंतर, आयुक् पशुसंवर्धन यांचे मार्फत सदरचे प्रकल्प प्रस्ताव राष्ट्रीय पशुधन अभियान अंतर्गत केंद्र शासनाने

विकसित केलेल्या ऑनलाइन पोर्टलद्वारे अपलोड करून सदर प्रस्ताव केंद्र शासनास प्रकल्प मंजूरीकरिता व केंद्र शासनाच्या अनुदानाचा निधी वितरणाकरिता सादर करण्यात येतील.

- NLM अंतर्गत उद्योजकता प्रकल्पाव्यतिरिक्त इतर प्रकल्पाचे प्राप्त झालेले प्रस्ताव आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयाच्या स्तरावरून छाननी करून, सदर प्रकल्प राज्यस्तरीय कार्यकारी समितीसमोर (एसएलईसी) केंद्र शासनास शिफारसीकरिता सादर करण्यात येतील. राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) द्वारे प्रकल्पांना मंजूरीस्तव शिफारस प्राप्त झाल्यानंतर, आयुक्त पशुसंवर्धन यांचे मार्फत सदरचे प्रकल्प प्रस्ताव राष्ट्रीय पशुधन अभियान अंतर्गत केंद्र शासनाने विकसित केलेल्या ऑनलाइन पोर्टलद्वारे अपलोड करून सदर प्रस्ताव केंद्र शासनास प्रकल्प मंजूरीकरिता व केंद्र शासनाच्या अनुदानाचा निधी वितरणाकरिता सादर करण्यात येतील.
- केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन विभागाची प्रकल्प मंजूरी समिती राज्य शासनाने शिफारस केलेल्या प्रकल्पांना मंजूरी देईल आणि मंजूर प्रकल्पांसाठी अनुदानाची रक्कम भारतीय लघु उद्योग विकास बँक (SIDBI) द्वारे लाभार्थ्यांना कर्ज देणारी बँक किंवा वित्तीय संस्थेकडे देईल.
- सबंधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, यांनी उद्योजकांच्या प्रकल्पांवर देखरेख ठेवावयाची असून, दर ६ महिन्यांनी प्रकल्पाच्या प्रगतीबद्दल आयुक्त पशुसंवर्धन यांना सूचित करण्याची जबाबदारी त्यांची असेल. तसेच उद्योजकांव्यतिरिक्त इतर प्रकल्पांच्या संदर्भात देखिल प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन हे आयुक्त पशुसंवर्धन यांना उपयोगीता प्रमाणपत्र, भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल दर ६ महिन्यांनी सादर करतील.
- राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत ज्या योजनांची अंमलबजावणी आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपुर व पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ गोखलेनगर, पुणे या शासन अंगीकृत संस्था मार्फत सुरू करण्यात येत आहे, त्या योजनांचे सनियंत्रण संबंधित संस्था करतील.

**राष्ट्रीय पशुधन अभियान अंतर्गत लाभ घेण्यासाठी उद्योजक संस्थांसाठी पात्रता निकष :-**

उद्योजक संस्थांनी खालील निकष पूर्ण केल्यास उद्योजकता कार्यक्रमांतर्गत लाभ घेण्यासाठी त्यांना पात्र मानले जाईल.

- उद्योजक संस्थांनी प्रकल्प सबंधित प्रशिक्षण प्राप्त केलेले असावे किंवा त्यांचेकडे प्रशिक्षित तज्ञ असावेत किंवा त्यांच्याकडे संबंधित क्षेत्राच्या व्यवस्थापनामध्ये आणि प्रकल्पाच्या व्यवस्थापनाच्या संबंधित क्षेत्रात पुरेसा अनुभव असलेले अनुभवी तज्ञ असावेत.
- उद्योजक संस्थांना त्यांचे खाते असणाऱ्या शेड्यूल बँकेकडून मान्यताप्राप्त प्रकल्पासाठी कर्ज मंजूरी / कर्ज हमीपत्र / वित्तीय संस्थांची बँक गॅरंटी प्राप्त करून घेणे आवश्यक आहे.
- उद्योजक संस्थांकडे प्रकल्पासाठी आवश्यक असणारी स्वतःची जमीन किंवा भाडेपट्टीची जमीन असावी.
- उद्योजक संस्थांकडे KYC साठी सर्व संबंधित कागदपत्रे असावीत.

**योजनेचे संनियंत्रण :**

- योजनेचे सनियत्रंण हे एमआयएस या ऑनलाइन प्रणालीद्वारे प्रकल्पातील माहितीचा आधार घेऊन करण्यात यावे. जीआय टॅगिंगद्वारे प्रकल्पाच्या मालमत्तेची देखरेख करण्यात यावी.
- प्रकल्पाचा नियमित त्रैमासिक आढावा हा जिल्हा /प्रादेशिक स्तरावर घेण्यात येवून, प्रकल्पाचा भौतिक आणि आर्थिक प्रगती अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी विहित केलेल्या नमुन्यात त्यांना सादर करण्यात यावा.

केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार राज्यात अंमलबजावणी यंत्रणेमार्फत राष्ट्रीय पशुधन अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेची अंमलबजाणी करण्यात यावी. अंमलबजावणी यंत्रणेने केंद्र शासनास सादर करावयाचे विहित प्रपत्रातील उपयोगीता प्रमाणपत्र, भौतिक साध्य व प्रगती अहवाल राज्य शासनामार्फत केंद्र शासनास सादर करण्यात यावेत.

**प्रकल्प अंमलबजावणी मध्ये सहभाग :**

क्षेत्रिय स्तरावरील गाव पातळीपर्यंत योजना अधिक प्रभावशाली पध्दतीने राबविण्याच्या तसेच संनियंत्रणाच्या दृष्टीने स्थानिक स्वराज्य संस्थेतील ग्रामपंचायत, पंचायत समिती, जिल्हा परिषद सदस्य यांचा सहभाग घेण्यात यावा. तसेच पशुधनाच्या जाती सुधारणेसाठी, संसाधने ओळखण्यासाठी, राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान (एनआरएलएचएम) अंतर्गत पशुसखी यांचा सहभाग घेण्यात यावा.

या अभियानांतर्गत सर्व योजनांना व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत प्राप्त होणाऱ्या विविध प्रस्तावांना आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी तांत्रिक मान्यता द्यावी.

या अभियानांतर्गत विविध योजनांचे अंमलबजावणी अधिकारी संबंधित जिल्ह्यांचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे राहतील.

या अभियानांतर्गत राबवावयाच्या विविध योजनांसाठीचे नवीन लेखाशिर्ष यथावकाश उपलब्ध करुन घेवून ते कळविण्यात येतील.

राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या राज्यातील प्रभावी अंमलबजावणीसाठी आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी केंद्र शासनाकडून वेळोवेळी निर्गमित झालेल्या मार्गदर्शक सूचना व सदर शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेवून आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रिय कार्यालयांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ३५९/१४३१ दि.१७.११.२०२१ तसेच, वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.५२७/२०२१ दि.६.१२.२०२१ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२७१४५०४४५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2021.12.27 14:55:57 +05'30'

**(डॉ.संजय वि. डोईजोडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य,
७) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष्यांचे मध्यवर्ती कार्यालये,

८) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा) - १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
९) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
११) सचिव, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, कृषि मंत्रालय, नवी दिल्ली.
१२) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१६) आयुत पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) जिल्हाधिकारी, सर्व
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१९) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२०) विधीमंडळ ग्रंथालय
२१) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन. सर्व
२२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला.
२३) विभागीय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, पुणे.
२४) विभागीय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, तेलंगखेडी, नागपूर
२५) विभागीय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, (हर्सुल), औरंगाबाद
२६) विभागीय व्यवस्थापक, नाबार्ड, शिवाजीनगर, पुणे
२७) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व
२८) उपसंचालक, लेखा व कोषागार, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई, औरंगाबाद, नाशिक व अमरावती
२९) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
३०) जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
३१) अवर सचिव, पदुम-३, कक्ष अधिकारी पदुम १, २ व १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३२) निवड नस्ती-पदुम-४